**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या बी.एस.यु.पी. योजनेतील अपूर्ण इमारतीची कामे पूर्ण करण्यासाठी कर्ज घेण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-१११८/प्र.क्र.१३१/१८/नवि-२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.

**दिनांक:- १२ फेब्रुवारी, २०१९**

संदर्भ:- १. मिरा-भाईंदर महानगरपालिका महासभा ठराव क्र.४४, दि.२६.०७.२०१८.
२. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/साबां./५२२/१८-१९, दि.२७.०८.२०१८.
३. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/साबां./सप/१०३८/१८-१९, दि.११.१२.२०१८.

**प्रस्तावना:-**

जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान अभियानांतर्गत "शहरी गरीबांना मुलभुत सुविधा पुरविणे (BSUP)" या उपक्रमाच्या अंमलबजावणीबाबत महाराष्ट्र शासनाच्या गृहनिर्माण विभागाने दि.२५.०६.२००७ च्या शासन निर्णयान्वये सुचना निर्गमित केल्या होत्या. त्यानुसार मिरा-भाईंदर महानगरपालिकेने केंद्र शासनाच्या जवाहरलाल नेहरु नागरी पुनरुत्थान अभियानांतर्गत "शहरी गरीबांना मुलभुत सुविधा पुरविणे" या उपक्रमामध्ये महानगरपालिका क्षेत्रातील काशीमिरा येथील जनतानगर व काशीचर्च या दोन झोपडपट्ट्यांमध्ये मुलभुत सुविधा पुरविण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून म्हाडामार्फत केंद्र शासनास सादर केला होता. त्याअनुषंगाने रु.२७९.५५ कोटी किंमतीच्या सदर प्रकल्पास दि.११.११.२००९ रोजी केंद्र शासनाची मान्यता प्राप्त झाली.

२. सदर प्रकल्पाच्या कामाकरिता निविदा प्रक्रिया पूर्ण करून स्थायी समिती सभा दि.०५.०८.२०१०, ठराव क्र.३६ अन्वये कंत्राटदारांना कार्यादेश देण्यात आलेले आहेत.

३. केंद्र शासन व राज्य शासन यांच्याकडून रु.६७.९४ कोटी निधी प्राप्त झाला आहे. दि.३१.०३.२०१७ रोजी बी.एस.यु.पी. योजना बंद झालेली आहे.

४. सदर योजनेत एकूण १८ बिल्डींगमध्ये ४१३६ सदनिका बांधण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. त्यापैकी दोनच बिल्डींग पूर्ण झालेल्या आहेत. सदर दोन बिल्डींगपैकी एका बिल्डींगमध्ये १७९ लाभार्थ्यांना सदनिका वाटप करण्यात आलेल्या आहेत. एकूण ११ बिल्डींगच्या कामाला अद्याप सुरूवात झालेली नाही, तर ५ बिल्डींगचे काम काही टप्प्यापर्यंत पूर्ण झालेले आहे. सद्यस्थितीत अपूर्ण अवस्थेत असलेल्या १६१९ सदनिकांचे काम पूर्ण करण्यासाठी १५० कोटीचे कर्ज घेण्यास महानगरपालिकेच्या महासभेने ठराव क्र.४४, दि.२६.०७.२०१८ अन्वये मंजुरी दिली असून, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-१०९ अन्वये महानगरपालिकेस अधिनियमात विनिर्दिष्ट केलेल्या योजनांसाठी आवश्यक असलेली रक्कम कर्जाऊ देण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन दि.२७.०८.२०१८ च्या पत्रान्वये विनंती केलेली आहे.

५. मिरा-भाईंदर महानगरपालिका राबवित असलेली बी.एस.यु.पी. योजना ही In Situ प्रकारात मोडत असल्याने, सर्व लाभार्थ्यांना सदनिका देणे आवश्यक आहे. सबब सदर योजना पुर्णत्वास नेण्याच्या दृष्टीने

मिरा-भाईंदर महानगरपालिकेला महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-१०९ नुसार कर्ज उभारण्यास शासन मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या बी.एस.यु.पी. योजनेमध्ये अपूर्ण असलेल्या ६ बिल्डींगमधील १,६१९ सदनिकांची अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून रु.१५० कोटींच्या मर्यादेत कर्ज उभारण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-१०९ नुसार पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**अ) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून घ्यावयाच्या कर्जाचा विनियोग केवळ मिरा-भाईंदर महानगरपालिका क्षेत्रातील बी.एस.यु.पी. मधील अपूर्ण असलेल्या ६ बिल्डींगमधील एकूण १,६१९ सदनिकांची कामे पूर्ण करण्यासाठीच करणे अनिवार्य असेल.**

**ब) मिरा-भाईंदर महानगरपालिकेने सदर कर्जाची उचल आवश्यकतेनुसार करावी.**

**क) सदर कर्जाच्या परतफेडीसाठी शासन हमी देणार नाही.**

**ड) महानगरपालिकेच्या उत्पन्नस्त्रोतांचा आढावा घेऊन उत्पन्न वाढीसाठी आवश्यक कार्यवाही करून सदर कर्ज निधीची व यापूर्वी उभारलेल्या कर्ज निधीची सव्याज परतफेड विहित कालावधीमध्ये करणेबाबत कार्यवाही करणे मिरा-भाईंदर महानगरपालिकेस बंधनकारक राहील.**

**इ) सदर कर्जाच्या अनुषंगाने शासनाच्या मालकीची किंवा शासनाच्या परवानगीची आवश्यकता आहे अशी कोणतीही मालमत्ता तारण ठेवता येणार नाही.**

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०२१२१४५२४१००२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2019.02.20 15:48:01 +05'30'

**(नवनाथ रा. वाठ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
३) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-१) यांचे वि.का.अ., नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ., नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती (नवि-२८).